बायोमेडिकल वेस्ट (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, १९९८ च्या अंतर्गत ॲथोरायझेशनसाठी सुधारित फी आकारण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग, मंत्रालय,
शासन निर्णय क्रमांक: इएनव्ही/२०००/२८०/प्र.क्र-२०/ तां.क.३
नविन प्रशासन भवन, १५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० एप्रिल, २०००.

**शासन निर्णय :-** पर्यावरण (संरक्षण) अधिनियम, १९८६ (२९/१९८६) च्या कलम ६, ८ आणि २५ अन्वये केंद्रीय वने व पर्यावरण मंत्रालय यांच्या सूचना क्रमांक: एस ओ-६३० (ई), दिनांक २० जुलै, १९९८ प्रमाणे बायोमेडिकल वेस्ट (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, १९९८ प्रकाशित करण्यांत आले आहेत.

राज्य शासनाला बायोमेडिकल वेस्ट नियमांतर्गत ॲथोरायझेशन अर्ज करताना फी विहित करण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत. राज्यात उद्योग उभारण्यासाठी व उद्योग सुरु करण्यासाठी परवानगी देताना उद्योगांच्या गुंतवणूकीच्या रक्कमेप्रमाणे फी आकारण्यांत येते. रुग्णालयांना ॲथोरायझेशन देताना आकारावयाची फी ही सुध्दा उद्योग उभारण्यासाठी परवानगी देताना आकारण्यांत येणाऱ्या फी प्रमाणे आकारण्यांत यावी, असे बायोमेडिकल वेस्ट (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, १९९८ मधील नियम क्रमांक ८(३) अन्वये पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन यांनी संमतीपत्र देण्यासाठी पत्र क्रमांकः इएनव्ही १०९८/ ५५९/ प्रक्र -६८/ का. -१, दिनांक ९/३/९९ अन्वये ठरविण्यांत आले होते.

राज्य शासनाला बायोमेडिकल वेस्ट नियमांतर्गत ॲथोरायझेशन फी जास्त असल्याबाबत निवेदने प्राप्त झाली होती. त्या निवेदनांचा विचार करुन राज्य शासनाने संदर फीचे पुर्ननिर्धारण करण्याचे ठरविले आहे. त्यानुसार ॲथोरायझेशन फी खालील प्रमाणे निश्चित करण्यांत आलेली आहे.

(अ) रुग्णालये व शुश्रुषालये :-

| | | | |
|---|---|---|---|
| i) | ५० रुग्णशय्या पर्यन्त | रु. ०२,५००/- | प्रतिवर्षी |
| ii) | ५१ ते २०० रुग्णशय्या पर्यन्त | रु. ०५,०००/- | प्रतिवर्षी |

iii) २०१ ते ५०० रुग्णशय्या पर्यन्त रु. १०,०००/- प्रतिवर्षी

iv) ५०१ ते त्यावरील रुग्णशय्या रु. १५,०००/- प्रतिवर्षी

(ब) बायोमेडिकल वेस्ट बाबत सुविधा पुरविणारे. रु. १०,०००/- प्रतिवर्षी

(क) बायोमेडिकल वेस्टचे वाहतूकदार रु. ०७,५००/- प्रतिवर्षी

(ड) बायो-मेडिकल वेस्ट उत्पन्न करणाऱ्या हाताळणाऱ्या इतर सर्व संस्था (वरील अ,ब,क व्यतिरिक्त) रु. ०२,५००/- प्रतिवर्षी

सुधारित फी संरचना, हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

शै. (कु. शर्मा) 20.4.00

(डॉ.शैलेशकुमार शर्मा)
संचालक ( पर्यावरण )

प्रति, खाजगी सचिव,मा.मंत्री ,पर्यावरण
खाजगी सचिव,मा.राज्यमंत्री, पर्यावरण
प्रधान सचिव, पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग,मंत्रालय,मुंबई
सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,मुंबई
सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
निवड नस्ती,